सहकारी साखर कारखाने
२०१५-२०१६ वर्षाकरिता सतत व समवर्ती लेखापरिक्षण कर्मचारी वर्ग पुढे चालू ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्रमांकः ससाका-२०१५/प्र.क्र.८५/२५स.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ९ ऑक्टोबर, २०१५

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.ससाका-२०१३/प्र.क्र.७२ /२५-सी, दिनांक ९ एप्रिल, २०१३
२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र. २१७/आस्थापना/कक्ष-१/साखर कारखाना / मुदतवाढ / २०१४/ दि.१३/ ३/२०१४ चे पत्र
३) शासन निर्णय क्रमांकः सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.राजस-१००८ / प्र.क्र.५३८ / ५-स, दिनांक ५/५/२०११
४) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांकः सपववि- ३४०२४ /६ / २०१४-DESK -२५C दि.२० मे, २०१४.
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : असंक-१००४/ प्र.क्र.१२/ ( भाग-२)/२००४/ विसु-१, दि. ४/१०/२००४
६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : पदनि-२०१५/ प्र.क्र.५/१५ विसु-१ दि. २० फेब्रुवारी, २०१५.
७) शासन निर्णय क्रमांकः सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.ससाका-२०१५/प्र.क्र.८५ / २५-सी, दिनांक : ५ मे., २०१५
८) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र. ९३४/आस्था/कक्ष-१/साखर कारखाना / मुदतवाढ / २०१५/ दि.२४/८/२०१५ चे पत्र

प्रस्तावना -

उपरोक्त वाचा-७ येथील दि. ५ मे, २०१५ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्रातील सहकारी साखर कारखान्यांचे सतत व समवर्ती लेखापरिक्षण करण्यासाठी निर्माण करण्यात आलेली २५५ अस्थायी पदे दि. ३१/८/२०१५ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली होती. तथापि, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था महाराष्ट्र राज्य,पुणे या कार्यालयाने दि. २४/८/२०१५ च्या पत्रान्वये सदर २५५ अस्थायी पदे दिनांक १/९/२०१५ ते २९/२/२०१६ पर्यन्त चालू ठेवण्यास मंजुरी देणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुसार सद्यस्थितीत सदर २५५ अस्थायी पदे दिनांक ०१/०९/२०१५ पासून दिनांक २९/०२/२०१६ पर्यंत चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

उपरोक्त वाचा क्र. ७ येथील दिनांक ५ मे, २०१५ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्रातील सहकारी साखर कारखान्यांचे सतत व समवर्ती लेखा परिक्षण करण्यासाठी निर्माण करण्यात आलेली २५५ अस्थायी पदे दिनांक ३१/८/२०१५ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिलेली होती. आता सहकार आयुक्त यांचे कार्यालयाकडील दि २४/८/२०१५ च्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावातील २५५ अस्थायी पदांना दिनांक १/९/२०१५ ते २९/२/२०१६ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन खालील अटींच्या अधीन राहून मंजुरी देत आहे :-

(१) प्रस्तावित योजनेस व त्याअंतर्गत २५५ अस्थायी पदांना, शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १०.९.२००१ नुसार, वेतन व भत्त्याच्या मागील वर्षाच्या खर्चाच्या तुलनेत चालू वर्षाच्या (सन २०१५-२०१६ ) खर्चात १.५ % बचत करण्यात येईल,

(२) सदर पदांना यापुढे मुदतवाढ देण्यापूर्वी लेखापरिक्षण शुल्काची थकबाकीची जास्तीत-जास्त रक्कम वसूल करण्यात यावी.

(३) लेखापरिक्षण शुल्काची (ऑडिट फी) वसूली पूर्णत: होण्याबाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दक्षता घ्यावी.

(४) वित्त विभागाचे शासन परिपत्रक, दिनांक १३ ऑगस्ट, २००३ मधील सूचनांचे पालन करण्यात येईल या अटीच्या अधीन मुदतवाढ देण्यात आलेली आहे. त्यानुसार पुढील मुदतवाढ घेण्यापूर्वी याबाबतची माहिती शासनास सादर करावी.

(५) वरील कालावधीत पदांची सुधारित मानके निश्चित करुन सुधारित आढाव्यास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्यात यावी.

(६) सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त असलेली पदे वगळण्यात यावीत.

(७) उपरोक्त अटी व शर्तीचे तंतोतंत पालन करावे व अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | एकूण पदे |
|---|---|---|---|
| १ | विशेष लेखापरिक्षक, वर्ग-१ | १५६००-३९१००+ग्रेड पे रु.५४०० | ३१ |
| २ | लेखा परिक्षक, श्रेणी -१ | ९३००-३४८००+ग्रेड पे रु.४३०० | ७० |
| ३ | लेखा परिक्षक, श्रेणी -२ | ९३००-३४८००+ग्रेड पे रु.४२०० | ६० |
| ४ | उपलेखा परिक्षक. | ५२००-२०२००+ग्रेड पे रु.२४०० | १२ |
| ५ | कनिष्ठ लिपिक. | ५२००-२०२००+ग्रेड पे रु.२४०० | ४२ |
| ६ | लघुटंकलेखक | ५२००-२०२००+ग्रेड पे रु.१९०० | ४ |
| ७ | शिपाई | ४४४०-७४४०+ग्रेड पे रु.१३०० | ३६ |
| | | **एकूण** | **२५५** |

२.        निवृत्ती वेतन आणि रजेचा पगार मिळून वरील कर्मचारी वर्गावर होणारा संपूर्ण खर्च लाभार्थी सहकारी साखर कारखान्यांकडून लेखा परिक्षण शुल्काचे स्वरुपात वसूल करण्यात यावा.

३.        यावरील खर्च, अर्थसंकल्प लेखाशीर्ष "मागणी क्र. व्ही-२ - २४२५, सहकार-००१, दोन-तपशील, संचालन व प्रशासन - (०१) (०१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था-(२४२५ ००२२)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०१५ - २०१६ या वित्तीय वर्षाकरिता होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४.        सदरहू शासन निर्णय, वित्त विभाग, असंग १००४/प्र.क्र.१२/ (भाग-२) २००४ /विसु-१, दिनांक ४/१०/२००४ आणि शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : पदनि-२०१५/प्र.क्र.५/१५ वित्तीय सुधारणा-१ दि. २० फेब्रुवारी, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे .

५.        सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००९१५५६१३४५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr Sudin Popat Gaikwad

Digitally signed by Dr Sudin Popat Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8ff188a569f4a95d2f0ce8ca61e60d8aa5f51a1bf65b42dd49bb26d165941d9e, cn=Dr Sudin Popat Gaikwad
Date: 2015.10.09 15:58:43 +05'30'

**( डॉ. सुदिन गायकवाड )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

**प्रति,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे **(५ प्रती )**

२) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.

३) कोषागार अधिकारी, यवतमाळ, वर्धा, नागपूर,सांगली, औरंगाबाद, सोलापूर, पुणे, कोल्हापूर, उस्मानाबाद,अमरावती, अहमदनगर, नाशिक,सातारा,बुलढाणा,नांदेड, लातूर, धुळे, जळगांव, जालना, परभणी, बीड,अकोला.

४) जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था, यवतमाळ, वर्धा, नागपूर,सांगली, औरंगाबाद, सोलापूर, पुणे, कोल्हापूर, उस्मानाबाद,अमरावती,अहमदनगर,नाशिक, सातारा, बुलढाणा, नांदेड, लातूर, धुळे, जळगांव, जालना, परभणी, बीड,अकोला.

५) विभागीय सहनिबंधक ( लेखापरिक्षक ), सहकारी संस्था, कोकण विभाग, मुंबई, पुणे, नागपूर, औरंगाबाद, नाशिक, अमरावती.

६) प्रादेशिक सहसंचालक ( साखर ) अहमदनगर, औरंगाबाद, नागपूर, नांदेड, कोल्हापूर, पुणे, अमरावती.

७) अपर निबंधक सहकारी संस्था ( लेखापरिक्षण ), महाराष्ट्र राज्य, पुणे - १.

८) महालेखापाल -१ ( लेखापरिक्षण ) महाराष्ट्र राज्य, महर्षि कर्वे मार्ग, मुंबई.

९) वित्त विभाग विसू-१ /मंत्रालय, मुंबई

१०) सर्व अधिकारी/कार्यासने, सहकार , पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) निवड नस्ती - ( २५-स.)